वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी अंतर्गत कापूस संशोधन केंद्र, नांदेड येथील नवीन इमारतीच्या बांधकामास प्रशासकीय <u>मान्यता देण्याबाबत...</u>

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्र.मकृवि-१२२४/प्र.क्र.७४/७-अे**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : १५/०३/२०२४

**संदर्भ:** १. महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांचे क्र.मकृप/वि.शि.२/८१२/२०२४, दि.०१.०३.२०२४ रोजीचे पत्र.
२. कुलसचिव,वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी यांचे का.प.२१२/कृ.प.बैठक११४/सा.प्र.वि.७/७३१, दि.०८.०२.२०२४ रोजीचे पत्र.
३.मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,नांदेड यांचे पत्र क्र.मुअना/२०२३/२४/४०११/दि.२७.१२.२०२३.

<u>प्रस्तावना:</u>-

वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी अंतर्गत नांदेड येथे कापूस संशोधन केंद्र कार्यरत आहे. कापूस संशोधन केंद्राची स्थापना सन १९४१ मध्ये झाली आहे. मराठवाडा विभागातील जमीन व हवामानास अनुकूल, अधिक उत्पादन देणाऱ्या, धाग्याच्या गुणधर्मात सरस असणाऱ्या व रोग किडींना प्रतिकारक अशा देशी व अमेरिकन कपाशीच्या सुधारित वाणांचा विकास करणे, हा या केंद्राचा प्रमुख उद्देश आहे.

कापूस संशोधन केंद्र,नांदेड येथील **कार्यालय इमारत क्र.१** या इमारतीचे बांधकाम सन १९४५ मध्ये झालेले असून या इमारतीस सद्य:स्थितीत जवळपास ७८ वर्ष पूर्ण झाली आहेत. या इमारतीमध्ये पावसाळयाच्या दिवसात तळघरात पाणी साचत असल्यामुळे या इमारतीचे R.C.C कॉलम क्षतीग्रस्त झालेले आहेत. तसेच, **कार्यालय इमारत क्र.२** या इमारतीचे बांधकाम सन १९८५ मध्ये झालेले असून या इमारतीस सद्य:स्थितीत जवळपास ३८ वर्ष पूर्ण झाली आहेत. पावसाळयात या इमारतीच्या छतातून पाणी गळत असल्याने इमारतीच्या सर्व भिंती ओल्या होऊन भिंतीत इलेक्ट्रीक करंट येत असल्याने, इमारतीचा कार्यालयीन कामकाजाकरीता वापर करणे धोकादायक झालेले आहे. यास्तव, सदर इमारतींचे संरचनात्मक लेखापरीक्षण (Structural Audit) करुन घेण्यात आलेले असून, त्यातील अहवालानुसार सदर इमारत धोकादायक असल्यामुळे पाडण्यात यावी, असे कळविले आहे.

वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी अंतर्गत कापूस संशोधन केंद्र, नांदेड येथील इमारतीचे बांधकाम करण्यास, कृषि विद्यापीठ कार्यकारी परिषद ठराव क्र.४१/ २१२/ दि.१९.०१.२०२४ अन्वये मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच, सदर कामाची निकड लक्षात घेता कृषि परिषदेच्या ११४ व्या बैठकीमध्ये मान्यता देण्याचे अधीन राहून, मा.मंत्री (कृषि) तथा अध्यक्ष कृषि परिषद यांनी, पूर्वमान्यता प्रदान केली आहे.

तसेच, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी अंतर्गत कापूस संशोधन केंद्र, नांदेड येथील इमारतीचे बांधकामाच्या रु.५.०० कोटीच्या प्रस्तावास मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नांदेड यांनी तांत्रिक सहमती दर्शविली आहे.

वरील सर्व बाबींचा विचार करता, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी अंतर्गत कापूस संशोधन केंद्र, नांदेड येथील नवीन इमारतींच्या बांधकामाच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,पुणे यांनी संदर्भ क्र.१ अन्वये शासनास सादर केला आहे. त्यानुषंगाने वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी अंतर्गत कापूस संशोधन केंद्र, नांदेड येथील नवीन इमारतींच्या बांधकामाच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी अंतर्गत, कापूस संशोधन केंद्र, नांदेड येथील नवीन इमारतींच्या बांधकामाच्या रु.५००.०० लाख (अक्षरी रुपये पाच कोटी फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. (सविस्तर तपशील **परिशिष्ट "अ"** मध्ये जोडला आहे.)

२. काम काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच,विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच काम सुरु करावे.

३. बांधकामाच्या अंदाजपत्रकावर अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशीक विभाग व उपभोक्ता विभागाच्या वतीने सक्षम प्राधीकाऱ्यांचे साक्षांकन असणे आवश्यक आहे.

४. प्रस्तावित कामासाठी जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिद्ध करण्यात याव्यात.

५. सार्वजनीक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय, क्र.बीडीजी २०१७/प्र.क्र.६०/ईमा-२, दि.०७.०७.२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

६. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय, दि.१०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

७. प्रस्तावित करण्यात आलेल्या इमारतींचे जोते क्षेत्रफळ कर्मचारीवर्ग व शासकीय इमारती यांच्या अनुज्ञेय मानकाप्रमाणे असल्याची खातरजमा करावी.

८. सदर कामांसाठी प्रशासकीय मान्यतेपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी .

९. या बाबीसाठी येणारा खर्च, मागणी मागणी क्र.डी-३,(००)(०९) वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (कार्यक्रम) २४१५ ०१०५ या लेखाशिर्षाखालील ३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान या उद्दीष्टाकरीता अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

१०. सदर आदेश वित्त विभाग,शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दि.२०.०९.२०१९ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उप विभाग-पाच, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका अंतर्गत परिच्छेदांखालील प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांमधील परिच्छेद क्र.१३४ (१) मधील तरतूदीन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०३१५२३०९१२०३०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATIBHA MADHAV PATIL

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
DN: CN = PRATIBHA MADHAV PATIL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2024.03.15 23:19:21 +05'30'

**( प्रतिभा पाटील )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महासंचालक,महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,पुणे.
२. कुलगुरु, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी.
३. कुलसचिव,वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी.
४. वित्तीय सल्लागार,महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
५. नियंत्रक,वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी.
६. विद्यापीठ अभियंता, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी.
७. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर.
८. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
९. जिल्हा कोषागार अधिकारी,परभणी,जि.परभणी.
१०.उपकोषागार अधिकारी,परभणी, जि.परभणी.
११.सहायक लेखाधिकारी, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी.
१२.मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१३.उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१४.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१५.निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१६.कक्ष अधिकारी २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१७.कार्यासन ७-अे (निवडनस्ती).

"परिशिष्ट -अ"

**Name of the Department : कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग.**

**Name of Work :- Proposed Building Construction of Cotton Research Station Nanded, Under Vasantrao Naik Marathwada Krishi Vidyapeeth Parbhani.**

**RECAPITULATION SHEET**

| Sr.No. | Particulars of Scope | | Unit Rate Norms Rs. Per (sqm/Meter/L.S.etc) | Cost Rs. Component wise in Rs. | Cost Rs. Total in Rs. |
|---|---|---|---|---|---|
| (A) | Essential Items (Components) | | | | |
| 1 | a) Building proper (b/u ara - sqm ) | | | | |
| | **1) Building** | | | | |
| | Ground Floor | 445.00 | 43010.69 | 19139756.00 | |
| | First Floor | 310.00 | 43010.69 | 13333313.00 | |
| | **Total b/u area =** | **755.00** | | **Sub Total (a)** | **32473069.00** |
| | b) Fuel gas pipeline | L.S | 0.00 | 0.00 | |
| | c) Bio digester | L.S | 0.00 | 0.00 | |
| | d) Rain roof water harvesting | L.S | 0.00 | 200000.00 | |
| | | | | **Sub Total (b+c+d+e+f+g)** | **200000.00** |
| 2 | Water supply & sanitary works | | 5% of (a) | 1623653.00 | |
| 3 | Electrification -Internal , | | 5% of (a) | 1623653.00 | |
| | External | | 6% of (a) | 1948384.00 | |
| | Fire fighting arrangement etc. | | 6% of (a) | 1948384.00 | |
| | C.W.pumps,generator,Transformer | L.S | | 0.00 | |
| | | | | **Sub Total (3)** | **7144074.00** |
| | | | **Sub Total (A)** | | **39817143.00** |
| (B) | Miscellaneous Items | | | | |
| | i) Compound wall and gate in M | 0.00 | 0.00 | 0.00 | |
| | ii) Chainlink fencing in M | LS | - | 0.00 | |
| | iii) Internal roads in sqm | 0.00 | 0.00 | 0.00 | |
| | iv) Development of ground, Running Track | | L.S. | 0.00 | |
| | v) Parking (General) | | L.S. | 0.00 | |
| | vi) CD Work | 0.00 | 0 | 0.00 | |
| | vii) Land scaping (Gardening,playground, tracking) | | L.S. | 0.00 | |
| | RCC GSRs and Sumps (Add for capacity above 75,000 upto 1,00,000 litres) | 0 | 0.00 | 0.00 | |
| | RCC ESR Cost of 1,00,000 litres capacity (2Nos) | 0 | 0.00 | 0.00 | |
| | Water main storage ,Pump house & borewell | | L.S. | 0.00 | |
| | | | | **Sub Total (B)** | **0.00** |
| | | | | **Sub Total (A) + Sub Total (B) =** | **39817143.00** |
| | | | **Project Cost (P) = (A+B)** | | **39817143.00** |
| (C) | Provisions | | | | |
| | i) Contingencies 5% on (a) | | | | 1990857.15 |
| | ii) G.S.T. 18% on (P) | | | | 7167086.00 |
| | iii)Labour Insurance.1% | | | | 398171.00 |
| | iv)Architect Fee 1.99% | | | | 792361.15 |
| | | | **Sub Total (C)** | | **10348475.30** |
| | | | | **TOTAL COST OF PROJECT (A+B+C) Rs.** | **50165618.30** |
| | | | | **Say** | **50000000.00** |

Plinth Area Rates for.

| | | | |
|---|---|---|---|
| 1) Building proper cost | Rs. | 43010.69 | Per sqm |
| 2) Elect work | Rs. | 9462.35 | Per sqm |
| 3) Water supply | Rs. | 0.00 | Per sqm |
| 4) For 1+2+3 | Rs. | 52473.04 | Per sqm |
| 5) Total project Cost = TPC/ Area (as per 'a') | Rs. | 66444.53 | Per sqm |

PRATIBHA MADHAV PATIL

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
DN: CN = PRATIBHA MADHAV PATIL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2024.03.15 23:19:46 +05'30'

( प्रतिभा पाटील )

उप सचिव, महाराष्ट्र शासन